**जिल्हा परिषदेच्या महिला व बाल कल्याण विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या संवर्गातील एकूण १३२ अस्थायी पदांना दि. १.३.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग,

शासन निर्णय क्र.मबाआ-२०११/ प्र.क्र.३८/ का.७

नवीन प्रशासन भवन,३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

दिनांक :- ३ मार्च, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५ एप्रिल, २००३.

२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/ २००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर २००४

३) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०१०/प्र.क्र.३९/का-७,दि.८ मार्च, २०१०.

४) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचेकडील क्र. मबाविआ/आस्था/अस्थायी पदे १०-११/ का-१/९०९६, दि.२.२.२०११

**<u>निर्णय</u>** :- महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि.५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेली पदे विचारात घेवून जिल्हा परिषदेच्या महिला व बाल कल्याण विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग ३ व वर्ग ४ च्या सोबतच्या यादीतील १३२ अस्थायी पदांना दि.२८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास वरील संदर्भाधीन दि.८.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर मुदत संपुष्ठात आल्याने, १३२ अस्थायी पदांपैकी एकही पद सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नव्हते. या अटीच्या अधीन राहून सदर पदांना दि.१.३.२०११ ते दि.२९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. १३२ पदे पुढे चालू ठेवण्यास मंजुरी दिलेल्या पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे राहील.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर, २००४ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०११३०३२०३३५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ज. कि. मगर)
शासनाच्या सह सचिव.

प्रति,
१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पूणे,
२) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी / सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी.
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
४) महालेखापाल महाराष्ट्र राज्य, १/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई ,
७) सर्व कोषागार अधिकारी,
८) वित्त विभाग (का-व्यय-१४ / अर्थसंकल्प-१९ / वित्तीय सुधारणा - १),मंत्रालय, मुंबई,
९) निवड नस्ती, का-७.

## शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०११/ प्र.क्र.३८/ का-७, दि.१ मार्च २०११ सोबतचे विवरणपत्र

### जिल्हा परिषद वर्ग ३ व वर्ग ४ अस्थायी पदांचे विवरणपत्र

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी रु. | मंजूर पदे (३३ जिल्हे) |
|---|---|---|---|
| १ | कक्ष अधिकारी | ५५००-९००० | ३३ |
| २ | वरिष्ठ सहाय्यक (लेखा) | ४५००-७००० | ३३ |
| ३ | कनिष्ठ सहाय्यक | ३०५०-४५९० | ३३ |
| ४ | शिपाई | २५५०-३२०० | ३३ |
| | | एकूण | १३२ |